कर, दंड व व्याज थकीत असलेल्या व्यापाऱ्यांसाठी
**"अभय योजना-२००४."**

# महाराष्ट्र शासन
## वित्त विभाग

**शासन निर्णय, वित्त विभाग क्र. विकअ-११.०४/प्र.क्र.- ५६ /कराधान-१**
**मंत्रालय, मुंबई ४०० ०३२, दिनांक १ जून २००४.**

**प्रस्तावना :—**

विक्रीकर विभागाकडून राबवल्या जाणा-या विविध कायद्यांखालील कर, व्याज व दंडापोटी व्यापा-यांनी दाखल केलेल्या दाव्यामुळे आणि त्यास अपील प्राधिका-यांनी दिलेल्या स्थगिती आदेशामुळे लक्षणीय रक्कम वसुलीविना अडकून पडली आहे. इतर काही कारणांनी आणखी काही रक्कमही थकीत आहे.

अशा रकमेची थकबाकी व दाव्याचे प्रमाण कमी होण्यासाठी मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९; केंद्रीय विक्रीकर अधिनियम, १९५६ ; महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रांमध्ये मोटार वाहने आणण्यावरील कर अधिनियम, १९८७ ; महाराष्ट्र ऐषआराम सेवांवरील कर अधिनियम, १९८७; महाराष्ट्र ऊस खरेदीकर अधिनियम, १९६२; मुंबई मोटार स्पिरीट विक्रीकराधान अधिनियम, १९५८; महाराष्ट्र कार्यकंत्राटाच्या अंमलबजाणीत अंतर्भूत असलेल्या मालातील मालमत्तेच्या हस्तांतरणावरील विक्रीकर (पुनर्धिनियमित)कर अधिनियम, १९८९; महाराष्ट्र कोणताही माल कोणत्याही प्रयोजनार्थ वापरण्याच्या हक्काच्या हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियम, १९८५ आणि महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रात मालाच्या प्रवेशावरील कर अधिनियम, २००२ या अधिनियमांखाली एक अभय योजना जाहीर करण्याचा प्रस्ताव शासनाच्या विचाराधीन होता. त्यानुसार आता यथायोग्य विचार करून शासनाने एक अभय योजना जाहीर करावी असे ठरविले आहे. या योजनेस **" अभय योजना-२००४ "** असे संबोधण्यात येईल.

**शासन निर्णय :—**

**(१) "अभय योजना-२००४" चा कालावधी**

" अभय योजना-२००४ " ही दिनांक १ जुलै २००४ पासून सुरू होणा-या चार महिन्यांच्या कालावधीमध्ये दोन टप्प्यांत अंमलात येईल. " अभय योजना-२००४ " चा पहिला टप्पा दिनांक १ जुलै २००४ ते ३१ ऑगस्ट २००४ पर्यंत असेल. दुसरा टप्पा १ सप्टेंबर २००४ ते ३१ ऑक्टोबर २००४ पर्यंत असेल.

**(२) योजनेची व्याप्ती.**

२.१ ही अभय योजना नोंदणीकृत तसेच अनोंदणीकृत व्यापा-यांसाठी खुली राहील आणि त्यात सर्व निर्धारित कालावधी, तसेच ज्या अनिर्धारित कालावधीचा विवरणपत्र दाखल करण्याचा दिनांक ३१ मे २००४ हा किंवा यापूर्वी येत असेल अशा सर्व अनिर्धारित कालावधीचा समावेश राहील.

२.२ सामुहिक प्रोत्साहन योजनेखालील विलंबन दिलेल्या घटकांना खालीलप्रमाणे भरणा केल्यास अभय योजनेचा लाभ मिळेल.

(१) अविवादित कराची रक्कम सद्य नक्त किंमतीनुसार भरावी ;आणि

(२) विवादित व्याज व शास्ती यांची " अभय योजना- २००४ " नुसार गणना करून देय रक्कम ठरवावी व या देय रक्कमेचा सद्य नक्त किंमत पद्धतीनुसार भरणा करावा.

एखादे घटक जर निर्धारणेच्या कालावधीच्या काही कालावधीसाठी विलंबनाखाली (deferral) असेल तर अशा घटकाच्या पूर्ण निर्धारणा कालावधीपैकी विलंबित व अविलंबित अशा दोन्ही कालावधीसाठी मिळणा-या अभय योजनेखालील लाभाची स्वतंत्रपणे गणना करण्यात येईल.

त्या घटकाने जर या अभय योजनेचा फायदा घेतला नसता तर प्रोत्साहनांची गणना जितकी झाली असती, तितकीच गणना या अभय योजनेचा लाभ घेतल्यानंतरसुद्धा होईल.

२.३ सामुहिक प्रोत्साहन योजनेखाली सवलत मिळालेल्या घटकाला, एखाद्या कालावधीत, त्या कालावधीच्या काही भागासाठी सूट मिळालेली असेल तर अशा घटकाला ज्या कालावधीसाठी सूट अनुज्ञेय नाही त्या कालावधीसाठीच फक्त अभय योजनेचा लाभ मिळू शकेल. म्हणजेच ज्या कालावधीत अशा घटकाला कराची सूट मिळालेली असेल अशा कालावधीकरिता या अभय योजनेचा लाभ घेता येणार नाही.

**(३) "अभय योजना-२००४" चे लाभ खालील अधिनियमानुसार लागू असलेल्या कायद्यांना अनुज्ञेय/उपलब्ध असतील —**

**(एक)** मुंबई विक्रीकर अधिनियम, १९५९

**(दोन)** केंद्रीय विक्रीकर अधिनियम, १९५६

**(तीन)** महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रांमध्ये मोटार वाहने आणण्यावरील कर अधिनियम,१९८७

**(चार)** महाराष्ट्र ऐषाराम सेवांवरील कर अधिनियम, १९८७

**(पाच)** महाराष्ट्र ऊस खरेदी अधिनियम, १९६२

**(सहा)** मुंबई मोटार स्पिरीट विक्रीकर अधिनियम, १९५८

**(सात)** महाराष्ट्र कार्यकंत्राटांच्या अंमलबजावणीत अंतर्भूत असलेल्या मालातील मालमत्तेच्या हस्तांतरणावरील विक्रीकर (पुनर्धिनियमित) अधिनियम, १९८९

**(आठ)** महाराष्ट्र कोणताही माल कोणत्याही प्रयोजनार्थ वापरण्याच्या हक्काच्या हस्तांतरणावरील विक्रीकर अधिनियम, १९८५

**(नऊ)** महाराष्ट्र स्थानिक क्षेत्रात मालाच्या प्रवेशावरील कर अधिनियम, २००२.

**(४) या अभय योजनेचे लाभ खालील बाबींसाठी अनुज्ञेय असतील —**

४.१ संबंधित अधिनियमाच्या कोणत्याही तरतुदीखालील, ३१ मे २००४ या दिनांकास किंवा त्यापूर्वी पारित केलेल्या वैधानिक आदेशानुसार देय असलेल्या कर, शास्ती व व्याजाची थकबाकी.

४.२ निर्धारणा आदेशाव्यतिरिक्त स्वतंत्रपणे ३१ मे २००४ या दिनांकास किंवा त्यापूर्वी पारित केलेल्या आदेशानुसार निर्धारणोत्तर व्याज धरून देय असलेली शास्ती व व्याजाची थकबाकी.

(शा. म. मु.) एच ६२८ (४,०००—६-२००४)

४.३ १ जून २००४ नंतर व " अभय योजना- २००४ " च्या समाप्तीपूर्वी पारित झालेल्या सर्व वैधानिक आदेशानुसार (अपीले आदेश वगळून) देय असलेली कर, व्याज व शास्तीची रक्कम .

४.४. जे अपील आदेश १ जून २००४ नंतर परंतु या अभय योजनेच्या समाप्तीपूर्वी पारित झाले असतील अशा अपिलांच्या बाबतीत–

जर अपील आदेशानुसार देय असलेला कर, व्याज व शास्तीची रक्कम कमी झाली असेल तर ज्या वैधानिक आदेशाविरुद्ध अपील दाखल करण्यात आले आहे अशा वैधानिक आदेशानुसार देय असलेला कर, व्याज किंवा शास्ती यांची थकबाकी ; तथापि

जर अपील आदेशानुसार देय असलेला कर, व्याज व शास्तीची रक्कम यात वाढ होत असेल तर ज्या वैधानिक आदेशाविरुद्ध अपील दाखल करण्यात आलेले आहे अशा वैधानिक आदेशात अपील आदेशामुळे झालेली थकबाकीची वाढ, [अपिलात दिलेली सवलत (relief) वगळता] तसेच मूळ वैधानिक आदेशानुसार देय असलेली थकबाकी अभय योजनेचे लाभ घेण्यास अनुज्ञेय ठरतील.

४.५ जे विवरणपत्र ३१ मे २००४ या दिनांकास किंवा त्यापूर्वी दाखल करणे आवश्यक होते अशा विवरणपत्राच्या अनिर्धारित कालावधीसाठी देय असणारे व्याज.

४.६ या अभय योजनेनुसार भरणा करण्याच्या दिनांकापर्यंत लावलेले किंवा लावण्याजोगे निर्धारणोत्तर व्याज.

**(५) विवादित व अविवादित कराची रक्कम.**

**"अभय योजना २००४"** च्या प्रयोजनासाठी निर्धारित तसेच अनिर्धारित कालावधीसाठी "अविवादित कराची रक्कम" म्हणजेच,—

(क) स्वतंत्रपणे वसूल केलेले कर, किंवा

(ख) स्वतंत्रपणे वसूल केलेले कर म्हणून वैधानिक आदेशात मान्य केलेली वजावट, किंवा

(ग) विवरणपत्रात देय म्हणून दर्शविलेले कर, किंवा

(घ) व्यापा-याने नियम ४६ अ नुसार वजावटीचा दावा केलेली रक्कम, किंवा

(च) उपरोक्त (क), (ख), (ग) किंवा (घ) च्या बाबतीतील अतिरिक्त कर/ अधिभार, उलाढाल कर मग हे कर वेगळे वसूल केलेले असोत वा नसोत आणि विवरणपत्रात देय म्हणून दर्शविलेले असोत वा नसोत, किंवा

(छ) आदेशात जप्त करण्यात आलेली रक्कम.

५.२ वरीलप्रमाणे " अविवादित कराची रक्कम " म्हणून ठरविलेल्या कराच्या रकमे व्यतिरिक्त इतर कराच्या रकमा " विवादित कराची रक्कम " म्हणून गणल्या जातील.

**(६) अभय योजने अंतर्गत सवलतीस पात्र असलेल्या रकमा.**

६.१ या अभय योजनेच्या प्रारंभापूर्वी भरणा केलेला किंवा परताव्याशी समायोजित केलेल्या रकमांच्याबाबतीत खालील परिच्छेद ६.२ व ६.३ मध्ये नमूद केलेल्या तरतुदींच्या अधीन राहून उपरोक्त परिच्छेद ४ मध्ये नमूद केलेल्या विविध रकमा या "अभय योजना- २००४" अंतर्गत सवलतीस पात्र असतील. अपिलात केलेला अंशत: भरणा इत्यादीसह निर्धारणा आदेशानंतर परंतु "अभय योजना-२००४" च्या प्रारंभापूर्वी भरणा केलेली रक्कम गृहित धरून सवलत देण्याच्या प्रयोजनासाठी रक्कम ठरविण्यात येईल.

६.२ या अभय योजनेच्या प्रारंभापूर्वी भरणा केलेली कोणत्याही सवलत मागितलेल्या निर्धारणा कालावधीची रक्कम ही खालील अग्रक्रमाने दर्शविलेल्या रकमेशी समायोजित करण्यात येईल.

(क) अविवादित कराची संपूर्ण रक्कम.

(ख) या अभय योजनेनुसार असलेली विवादित कराची रक्कम

(ग) व्याज व शास्तीची रक्कम,

आणि अशा समायोजनेशी सुसंगत राहील अशारितीने सवलतीस पात्र ठरणा-या उर्वरित कर, शास्ती व व्याज यांच्या रकमेची गणना करण्यात येईल. अभय योजनेनुसार व्यापा-याने भरावयाची रक्कम वरील अग्रक्रमाने समायोजित करण्यात येईल.

६.३ ज्या विवादित कर, व्याज व शास्तीच्या रकमेसाठी अभय योजनेचे लाभ अनुज्ञेय असतील अशी रक्कम म्हणजे व्यापा-याने भरणा केलेल्या रकमेच्या पुराव्यासहित अभय योजनेचा लाभ मिळण्याच्या आवेदनपत्राच्या दिनांकापर्यंत पारित केलेल्या आदेशानुसार असलेला परतावा आदेश या अभय योजनेत समाविष्ट असलेल्या कोणत्याही अधिनियमांखालील आणि कालावधीच्या कालानुक्रमे आणि परिच्छेद ६.२ मध्ये नमूद केलेल्या अनुक्रमानुसार समायोजित करण्यात येतील.

**(७) सवलतीस पात्र रक्कम.**

७.१ "अभय योजना- २००४" अंतर्गत विविध टप्प्यांत भरावयाची रक्कम व माफीची सवलत मिळण्यास पात्र असलेली रक्कम ही या सोबत जोडलेल्या <u>परिशिष्टात</u> दर्शविलेल्या तपशिलानुसार सवलतीस पात्र असेल, मात्र अशी सवलत, अभय योजनेनुसार करावयाच्या अविवादित कराच्या रकमेचा संपूर्ण भरणा तसेच विवादित कर, व्याज व दंडाच्या विहित केलेल्या टक्केवारीनुसार करावयाचा भरणा यांच्या अधीन असेल.

७.२. जर एखाद्या व्यापा-याने अनिर्धारित कालावधीसाठी या अभय योजनेखाली लाभ घेतला तर त्या कालावधीच्या संदर्भात जी शास्ती लागली असती ती शास्ती लावण्यात येणार नाही.

७.३. जर एखाद्या आदेशात शास्ती लावण्याचा हक्क राखून ठेवला असेल परंतु ३१ मे २००४ पर्यंत अशी शास्ती लावली नसेल आणि त्या आदेशाच्या कालावधीसाठी व्यापा-याने या योजनेखाली लाभ घेतला असेल तर त्या कालावधीसाठी शास्ती लावण्यात येणार नाही.

**(८) अभय योजनेनुसार करावयाचा भरणा आणि अपील मागे घेणे इत्यादी अभय योजनेच्या सवलतीचा लाभ घेण्यासाठी लागू असणा-या अटी :—**

८.१ "अभय योजना-२००४" या योजने अंतर्गत सवलतीचा लाभ घेण्यासाठी व्यापा-याने <u>परिशिष्टातील</u> स्तंभ (३) आणि स्तंभ (५) मध्ये दर्शविल्यानुसार रकमेचा भरणा केला पाहिजे आणि ज्या कालावधीसाठी सवलतीचा लाभ घ्यावयाचा या कालावधीचे कोणतेही प्रलंबित असलेले अपील, पुनर्निरीक्षणासाठी केलेले आवेदन, संदर्भ आवेदन, संदर्भ किंवा रीट याचिका प्रलंबित असल्यास ते विनाअट मागे घेतले पाहिजे.

८.२ जर अभय योजनेचा लाभ मिळाल्यानंतर अपील, संदर्भ आवेदन, पुनर्निरीक्षण आवेदन, संदर्भ किंवा रीट याचिका दाखल केली तर अभय योजनेनुसार संबंधित कालावधीसाठी दिलेल्या सवलती काढून घेण्यात येतील.

**(९) "अभय योजना-२००४" ची वैशिष्ट्ये :—**

९.१ या अभय योजनेच्या प्रयोजनार्थ प्रत्येक निर्धारणा कालावधी एक स्वतंत्र घटक समजला जाईल. व्यापारी त्याच्या विकल्पानुसार एक किंवा एकापेक्षा अधिक निर्धारणा कालावधीसाठी या योजनेचा लाभ घेऊ शकेल. तसेच या योजने अंतर्गत वरील परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद केलेल्या एका किंवा एकापेक्षा अधिक अधिनियमाखाली देखील या योजनेचा लाभ घेऊ शकेल.

९.२ १ जून २००४ या दिनांकास किंवा ह्यानंतर मात्र अभय योजना समाप्तीपूर्वी पारित झालेल्या अपील आदेशाव्यतिरिक्त कोणत्याही निर्धारणा कालावधीसाठी इतर वैधानिक आदेशाच्या बाबतीत व्यापा-यास अशा सर्वात अखेरीस पारित झालेल्या वैधानिक आदेशानुसार मागणी केलेल्या रकमेसाठीच या योजनेनुसार सवलत मागता येईल.

९.३ जर निर्धारणापूर्व आणि/ किंवा निर्धारणोत्तर व्याजाची आकारणी करण्यात आली नसेल किंवा करावयाची राहून गेली असेल तर अशा बाबतीत व्यापारी अभय योजना अस्तित्वात नाही असे गृहीत धरून व्याजाची गणना करून **परिशिष्टात** दर्शविल्यानुसार रकमेचा भरणा करून अभय योजनेचा लाभ घेऊ शकेल. ही अट अनिर्धारित कालावधीसाठीही जशीच्या तशी लागू असेल.

९.४ उपरोक्त परिच्छेद क्र.३ मध्ये नमूद केलेल्या विविध अधिनियमांच्या तरतुदीखालील अनिर्धारित कालावधीच्या बाबतीत आकारण्यात आलेले किंवा आकारण्याजोगे व्याज "अभय योजना-२००४" अंतर्गत सवलतीस पात्र असेल.

९.५ एखाद्या व्यापा-याने या पूर्वीच्या अभय योजनेअंतर्गत एखाद्या विशिष्ट कालावधीसाठी लाभ घेतला असेल अशा व्यापा-यास सांप्रत अभय योजनेचा लाभ मिळण्यापासून वंचित करण्यात आलेले नाही.

९.६ ज्या वैधानिक आदेशाच्या बाबतीत अभय योजनेचा लाभ देण्यात आला अशा आदेशाच्या बाबतीत वस्तुस्थितीनुरूप कर, व्याज किंवा शास्ती यात वाढ करण्याबाबतचे वैधानिक आदेश पारित करण्याचा विक्रीकर विभागाचा हक्क अबाधित राहील. तथापि, अशा नंतरच्या आदेशामुळे या अभय योजनेनुसार दिलेल्या सवलतीवर परिणाम होणार नाही.

**(१०) कार्यवाहीविषयक बाबी :—**

१०.१ अभय योजनेचा लाभ घेण्यासाठीचे आवेदनपत्र विक्रीकर आयुक्तांनी विहित केलेल्या नियमानुसार असले पाहिजे आणि त्याबरोबर "अभय योजना-२००४" नुसार करावयाच्या रकमेचा भरणा केल्याचे पुरावे सादर केले पाहिजेत.

१०.२ अभय योजनेचा लाभ घेण्यासाठी आवश्यक असलेल्या रकमेचा भरणा अभय योजना कालावधीतच केला पाहिजे. व्यापा-याने जर अशा आवश्यक रकमेचा अंशत: भरणा पहिल्या टप्प्यात केला व उर्वरित भरणा दुस-या टप्प्यात केला तर अशा प्रकरणी व्यापा-याने आवश्यक रकमेचा संपूर्ण भरणा दुस-या टप्प्यात केला असे समजून त्यानुसार व्यापारी अभय योजनेचे लाभ मिळण्यास पात्र ठरेल. व्यापा-यांनी रक्कम भरणा करावयाच्या चलनावर "अभय योजना-२००४" असे लिहिले पाहिजे.

**(११) "अभय योजना २००४" अंतर्गत कोणताही परतावा नाही.**

"अभय योजना-२००४" ही योजना सुरू होण्यापूर्वी भरणा केलेल्या कोणत्याही रकमेच्या परताव्यासाठी या योजने अंतर्गत दावा करता येणार नाही.

**(१२) "अभय योजना-२००४" अंतर्गत अर्थ लावण्याचा अधिकार.**

ही अभय योजना अंमलात आणण्यासाठी योग्य अशी कार्यपद्धती विक्रीकर आयुक्त आवश्यकतेनुसार तयार करतील. "अभय योजना-२००४" या योजनेच्या अंमलबजावणी विषयी कोणतीही अडचण उद्भवल्यास योजनेच्या तरतुदींचा अन्वयार्थ निश्चित करण्याचे अंतिम अधिकार विक्रीकर आयुक्तांना राहतील व याबाबतीत त्यांचा निर्णय अंतिम असेल.

**(१३)** या अभय योजने अंतर्गत कोणताही वैधानिक आदेश निर्गमित केला जाणार नाही आणि कोणत्याही वैधानिक आदेशात "अभय योजना-२००४" च्या आधारावर निर्णय दिला जाणार नाही.

**(१४) अभय योजनेची जाहिरात व प्रसिद्धी**

सदर अभय योजना यशस्वी होण्यासाठी या योजनेस मोठ्या प्रमाणावर प्रसिद्धी देणे आवश्यक आहे. या योजनेच्या जाहिरात व प्रसाराच्या प्रयोजनासाठी रु. २० लाख एवढी रक्कम मंजूर करण्यात येत आहे. या बाबीचा खर्च २००४-२००५ या वर्षाच्या निधीतून खालील शीर्षातून खर्ची दाखविण्यात यावी.

जी - १

२०४० - विक्रीकर

००१- संचालन व प्रशासन

(००)(०१) - विक्रीकर आयुक्त (२०४० ००४२)

०९-जाहिरात खर्च

अतिरिक्त निधी विधीमंडळाच्या मान्यतेनंतर उपलब्ध करून देण्यात येईल.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

**एस.एन. जामोदे,**
महाराष्ट्र शासनाचे उप सचिव.

प्रत,
माहितीसाठी व आवश्यक त्या कार्यवाहीसाठी अग्रेषित.

(१) महालेखापाल (लेखा व परीक्षा)-१, महाराष्ट्र, मुंबई
(२) महालेखापाल (लेखा व परीक्षा)-२, नागपूर, मुंबई.
(३) संचालक, लेखा व कोषागारे, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
(४) विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, ८ वा मजला, माझगाव, मुंबई ४०० ०१० (४० प्रती).
(५) अध्यक्ष, महाराष्ट्र विक्रीकर न्यायाधिकरण, माझगाव, मुंबई ४०० ०१० (५ प्रती).
(६) अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई.
(७) निवासी लेखा परीक्षक, मुंबई.
(८) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मुंबई.
(९) कार्यासन अधिकारी, कराधान-३, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
(१०) निवड नस्ती, कराधान-१.

## शासन निर्णय ११.०४/प्र.क. ५६/कराधान-१
**(दिनांक १ जून २००४ सोबतचे परिशिष्ट )**

## परिशिष्ट

| अ.क्र. | रक्कम | | अभय योजनेचा टप्पा | | | |
|---|---|---|---|---|---|---|
| | | | पहिला टप्पा | | दुसरा टप्पा | |
| | | | अभय योजनेअंतर्गत भरावयाची रक्कम | अभय योजनेअंतर्गत मिळणारी सवलत | अभय योजनेअंतर्गत भरावयाची रक्कम | अभय योजनेअंतर्गत मिळणारी सवलत |
| (१) | (२) | | (३) | (४) | (५) | (६) |
| (१) | विवादीत कराची रक्कम | | स्तंभ (२) मधील रकमेच्या ५०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ५०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ६०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ४०% |
| (२) | अविवादीत कराची रक्कम | | स्तंभ (२) मधील रकमेच्या १००% | नाही | स्तंभ (२) मधील रकमेच्या १००% | नाही |
| (३) | वैधानिक आदेश व विवरणपत्रानुसार भरावयाचे परंतु न भरलेले व्याज व | ३१ मार्च २००० रोजी किंवा त्यापूर्वी संपणाऱ्या निर्धारणा कालावधीसाठी. | स्तंभ (२) मधील रकमेच्या ५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या १०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९०% |
| | शास्ती. | १ एप्रिल २००० रोजी किंवा त्यानंतर संपणाऱ्या निर्धारणा कालावधीसाठी. | स्तंभ (२) मधील रकमेच्या १०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या २०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ८०% |
| (४)(क) | अभय योजनेखाली व्यापाऱ्याने केलेल्या आवेदनपत्राच्या दिनांकापर्यंत आकारण्यात आलेले निर्धारणोत्तर व्याज आणि/किंवा शास्ती. | | स्तंभ (२) मधील रकमेच्या ५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या १०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९०% |
| (ख) | अभय योजनेखाली व्यापाऱ्याने भरलेल्या आवेदनपत्राच्या दिनांकापर्यंत आकारण्याजोगे परंतु न आकारलेले निर्धारणोत्तर व्याज आणि/किंवा शास्ती. | | स्तंभ (२) मधील रकमेच्या ५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९५% | स्तंभ (२) मधील रकमेच्या १०% | स्तंभ (२) मधील रकमेच्या ९०% |

**टिपा :—**

(१) जर व्यापाऱ्याने २१ एप्रिल १९८७ रोजी किंवा त्यापूर्वी संपणाऱ्या कालावधीसाठी आवश्यक असणाऱ्या रकमेचा भरणा करून अभय योजनेखाली आवेदनपत्र सादर केले तर त्यास २१ एप्रिल १९८७ पर्यंत आकारलेल्या किंवा आकारण्याजोग्या शास्तीची संपूर्ण माफी मिळेल.

(२) वरील तक्त्यातील स्तंभ (३) मधील रकमेचा भरणा अभय योजनेच्या पहिल्या टप्प्यात करणे आवश्यक आहे.

(३) स्तंभ (५) मधील रकमेचा भरणा अभय योजनेच्या दुस-या टप्प्यात करणे आवश्यक आहे.

शासकीय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई.